कोषागारात देयके सादर करतांना
जोडावयाच्या जोडपत्रामध्ये सुधारणा
करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण - १०११ / प्र. क्र. २० / कोषा प्र - ५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०११.

**संदर्भ:-** वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण - १००६ / प्र. क्र. १३१ / कोषा प्र- ५, दिनांक १५/०५/२००७.

**शासन परिपत्रक :-** कोषागारात देयके सादर करतांना आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडून जोडल्या जाणाऱ्या जोडपत्रांपैकी काही जोडपत्रांची आवश्यकता उरलेली नाही अथवा कालमानाप्रमाणे त्यांच्या उपयोगामध्ये बदल करणे आवश्यक झालेले आहे. याचा विचार करुन देयके कोषागारात सादर करतांना त्यांचेसोबत जोडावयाच्या बीडीएस चिठ्ठी, संगणक चिठ्ठी, प्रमाणक चिठ्ठी या जोडपत्रात खाली नमूद केल्यानुसार सुधारणा करण्यात येत आहेत.

१. **संगणक चिठ्ठी :-** कोषागाराकडील लेख्यांचे संगणकीकरण प्राथमिक टप्प्यात असतांना संगणक चिठ्ठीचा वापर सुरु झाला होता. तथापी, संगणक चिठ्ठीवर असलेला तपशिल बीम्स प्रणाली मार्फत उपलब्ध होणाऱ्या देयक प्राधिकार पत्रावर असल्याने संगणक चिठ्ठी यापुढे देयकाला जोडण्याची आवश्यकता नाही.

२. **देयक प्राधिकार पत्र :-** यापूर्वी संदर्भांकित शासन निर्णयान्वये शासनाने देयक प्राधिकार पत्र (BDS slip) दोन प्रतीत देयकांबरोबर सादर करण्याचे आदेश दिले होते. यातील एक प्रत देयक स्विकारण्याची पावती म्हणून आहरण व संवितरण अधिकाऱ्याला परत करणे अपेक्षित होते.

आहरण व संवितरण अधिकाऱ्याला देयकांची पोच अन्य मार्गाने दिली जात असल्यामुळे देयक प्राधिकार पत्र एकाच प्रतीत देण्यात यावा. त्यामुळे संदर्भांकित शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १४ मधील तरतूदीत अंशत: सुधारणा करण्यात येत आहे. तसेच वित्त विभागाच्या संदर्भांकित शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १६ मधील तरतूदीही रद्द करण्यात येत आहेत.

३. **प्रमाणक चिठ्ठी :-** प्रमाणक चिठ्ठी देयकासोबत सादर करण्याचा हेतू देयके पारित झाल्यानंतर आहरण व संवितरण अधिकाऱ्याला प्रमाणक क्रमांक व दिनांक कळविणे हा आहे. तथापी, कोषागार

स्तरावर नवीन कोषागार प्रणालीत प्रमाणक क्रमांक हा धनादेशावर किंवा ईसीएस चिठ्ठीवर दिला असल्यामुळे कोषागारात सादर होणाऱ्या देयकांसोबत प्रमाणक चिठ्ठी जोडण्याची आवश्यकता असणार नाही. तथापी, उप कोषागार स्तरावर धनादेश देण्याची व्यवस्था नसल्याने उपकोषागारात सादर होणाऱ्या देयकांना ही चिठ्ठी जोडणे आवश्यक आहे.

सदर सूचनांची अंमलबजावणी दिनांक ०१/०४/२०११ पासून करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०३१६१७०२०५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(स. अ. मु. नकवी)
उप सचिव तथा विशेष कार्य अधिकारी,
वित्त विभाग

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे व उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालय प्रमुख,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र,मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा )-२, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा ), महाराष्ट्र, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय ( मूळ शाखा ),मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपील शाखा ), मुंबई,
प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकण भवन, नवी मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व उपकोषागार अधिकारी,
निवड नस्ती, वित्त विभाग-कोषा प्र-५.